जिल्हा वार्षिक योजनेअंतर्गत महसूल विभागांतर्गत मंडळ स्तरावर "छत्रपती शिवाजी महाराज महाराजस्व समाधान शिबीर अभियान" राबविण्याकरीता मंजूरी देण्याबाबत..

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः संकिर्ण-२०२५/प्र.क्र.३४/ई-८**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
दिनांक : २५ मार्च, २०२५.

**संदर्भ :-**

१) महसूल व वन विभाग, शासन निर्णय,क्र.संकिर्ण-२०२२/प्र.क्र.४०/ई-८, दि.२७/०६/२०२२.
२) नियोजन विभाग, शासन ज्ञापन,क्र.डिपीए-१०२२/प्र.क्र.१३९/का.१४८१, दि.१६/०१/२०२३.
३) जिल्हाधिकारी, नागपूर यांचे पत्र क्र.राजस्व/ब-३/कावि-१०८/२०२५, दि.०७/०३/२०२५

**प्रस्तावना :-**

महसूल विभागांतर्गत क्षेत्रिय स्तरावर ग्रामिण भागात सर्वसामान्य जनता, शेतकरी, विद्यार्थी व महिला यांचे महसूल विभागांशी संबंधित दैनंदिन प्रश्नांचे निराकरण करणे व जनतेच्या तक्रारी सत्वर निकालात काढणे, तसेच महसूल प्रशासन अधिक लोकाभिमुख, कार्यक्षम व गतिमान करण्यासाठी राज्यामध्ये मंडळ स्तरावर समाधान शिबिरांचे आयोजन करण्यात येणार आहे. सदर शिबिराचे आयोजन व त्या प्रित्यार्थ येणारा खर्च "गतिमान प्रशासन तथा आपात्कालीन व्यवस्थेचे बळकटीकरण" या योजनेतंर्गत सातवा घटक म्हणून सन २०२५-२०२६ या आर्थिक वर्षापुरता समाविष्ट करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

"गतिमान प्रशासन तथा आपत्कालीन व्यवस्थेचे बळकटीकरण" या योजनेंतर्गत प्रत्येक जिल्हयास मिळणाऱ्या नियतव्ययाच्या प्रमाणात कोणताही बदल न करता महसूली क्षेत्रिय कार्यालयाकडून जनतेस सोई-सुविधा उपलब्ध करुन देण्याकरीता "छत्रपती शिवाजी महाराज महाराजस्व समाधान शिबीर अभियान" मंडळ स्तरावर आयोजित करणे, हा सातवा घटक म्हणून सन २०२५-२०२६ या आर्थिक वर्षापुरता समाविष्ट करण्यास खालील अटींच्या अधिन राहून शासन मंजूरी देण्यात येत आहे.

१. प्रत्येक जिल्हयातील तालुक्यामध्ये मंडळ स्तरावर वर्षातून किमान चार वेळा "छत्रपती शिवाजी महाराज महाराजस्व समाधान शिबीर अभियान" आयोजित करण्यात यावेत. यामध्ये ग्रामिण भागात सर्वसामान्य जनता, शेतकरी, विद्यार्थी व महिला यांना रहिवाशी, उत्पन्न व जातीचे दाखले,रेशन कार्ड वाटप, सामाजिक लाभाच्या योजना जसे, संजय गांधी निराधार योजना, पीएम किसान योजना इ. महसूल विभागाशी संबंधीत विविध प्रमाणपत्रांचे वाटप, प्रमाणपत्राबाबत जनतेच्या तक्रारी सत्वर निकालात काढण्यात यावेत.

२. प्रत्येक शिबिरासाठी रुपये २५०००/- याप्रमाणे एका वर्षाकरीता रुपये १,००,०००/- (अक्षरी रुपये एक लक्ष ) इतक्या मर्यादेत खर्च करण्यात यावा.

३. या शिबिरामध्ये क्षेत्रिय स्तरावरील सर्वसामान्य जनतेला सोई-सुविधा उपलब्ध करुन देण्याकरीता तात्पुरते शिबिर-मंडप,स्टेशनरी इत्यादी बाबींवर खर्च करण्यात यावा.

४. मंडळ स्तरावर "छत्रपती शिवाजी महाराज महाराजस्व समाधान शिबीर अभियान" आयोजित करुन त्यामध्ये विविध महसूली दाखले, जनतेच्या तक्रारीचे निवारण तथा मार्गदर्शन करुन महसूली प्रशासन अधिक लोकाभिमुख, कार्यक्षम, व गतिमान करण्याच्या अनुषंगाने प्रयत्नशील रहावे.

५. सदर शिबिरामध्ये संबंधित उपविभागीय अधिकारी, तहसिलदार, नायब तहसिलदार, यांनी शिबिराच्या आयोजनाकरीता आराखडा तयार करुन कार्यक्रमांची अमंजबजावणी चोखपणे पार पाडावी.

६. प्रत्येक मंडळ स्तरावर "छत्रपती शिवाजी महाराज महाराजस्व समाधान शिबीर अभियान" आयोजित करुन त्याबाबतचा अहवाल संबंधित जिल्हाधिकारी यांना तहसिलदार यांनी सादर करावा.

२. जिल्हयातील प्रत्येक मंडळ स्तरावर "छत्रपती शिवाजी महाराज महाराजस्व समाधान शिबीर अभियान" याकरीता येणारा खर्च महसूल व वन विभाग, शासन निर्णय, क्र.संकिर्ण-२०२२/ प्र.क्र.४०/ई-८,दि.२७/०६/२०२२ अन्वये त्या-त्या आर्थिक वर्षाकरीता जिल्हा वार्षिक योजनेतर्गत "गतिमान प्रशासन तथा आपात्कालीन व्यवस्थेचे बळकटीकरण" या योजनेसाठी नियोजन विभागाने त्या-त्या जिल्हयास उपलब्ध करुन दिलेल्या तरतूदीतून भागविण्यात यावा.

३. सदर शासन निर्णय, नियोजन विभागाच्या संदर्भ क्रमांक ०४/२०२५, दि.१२/०३/२०२५, व वित्त विभागाच्या संदर्भ क्र.१६५/२०२५/व्यय-९,दिनांक १७/०३/२०२५ अन्वये त्या विभागाने दिलेल्या संमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०२५०३२६१२३४३४५४१९ असा आहे. सदर शासन निर्णय डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

SATYANARAYAN SHIVPRASAD BAJAJ

Digitally signed by SATYANARAYAN SHIVPRASAD BAJAJ
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FOREST DEPARTMENT, 2.5.4.20=559498df564ab1121a356349085c1b8e3cc0f12569ba0f7f2090386d4dccb333, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=F7145AF5949FB706E2DCB06C2B209B58FFA369F6E085E02041722C90F0528791, cn=SATYANARAYAN SHIVPRASAD BAJAJ
Date: 2025.03.26 14:53:10 +05'30'

**( सत्यनारायण बजाज )**
**उप सचिव,महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा.मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य, यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई,
२. मा.उपमुख्यमंत्री ( नगर विकास,गृह निर्माण, सार्वजनिक बांधकाम (सा.उ.) यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई
३. मा.उपमुख्यमंत्री (वित्त, नियोजन, राज्य उत्पान शुल्क ) यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई
४. सर्व मंत्री/राज्यमंत्री, यांचे खाजगी सचिव मंत्रालय, मुंबई
५. मा. मुख्य सचिव (महाराष्ट्र राज्य) यांचे स्विय सहायक, मंत्रालय, मुंबई,
६. अपर मुख्य सचिव (महसूल),यांचे विशेष कार्य अधिकारी, मंत्रालय, मुंबई,
७. अपर मुख्य सचिव (नियोजन), मंत्रालय, मुंबई,
८. विभागीय आयुक्त (सर्व),
९. जिल्हाधिकारी (सर्व),
१०. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) १/२, महाराष्ट्र, मुंबई/नागपूर,
११. महालेखापाल (लेखा परिक्षा) १/२, महाराष्ट्र, मुंबई/नागपूर,
१२. संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई,
१३. जिल्हा नियोजन अधिकारी (सर्व),
१४. जिल्हा कोषागार अधिकारी (सर्व),
१५. कार्यासन अधिकारी (ब-१),महसूल व वन विभाग मंत्रालय, मुंबई
१६. वित्त विभाग (कार्यासन व्यय -९/अर्थ-६), मंत्रालय, मुंबई
१७. नियोजन विभाग (कार्यासन १४८१) मंत्रालय, मुंबई
१८. निवड नस्ती (कार्यासन/ई-८)